सन २०१५-१६या वित्तीय वर्षात राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्याबाबत अतिरिक्त सूचना...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृविका २०१५ /प्र.क्र.१९८/३-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :१४ सप्टेंबर, २०१५**

वाचा: १) राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) च्या मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि. १८ जून, २०१५ च्या २० व्या बैठकीचे कार्यवृत्त.
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांकः कृविका २०१५ /प्र.क्र.१९८/३-अे, दि .३१.०७ .२०१५
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांकः राकृवि-०३१५/प्र.क्र.३१/राकृविया कक्ष, दि. ३१.०८.२०१५ .

**प्रस्तावना :-**

संदर्भांकित शासन निर्णय दि.३१ जुलै,२०१५ अन्वये राज्यातील पर्जन्यमानाची असमाधानकारक परिस्थिती विचारात घेऊन, आगामी काळात चारा टंचाई परिस्थितीवर मात करण्याच्या अनुषंगाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम राबविण्यास रु. २५ कोटी निधीच्या तरतूदीसह प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर कार्यक्रमांतर्गत चारा पिकांच्या उत्पादनासाठी शेतकऱ्यांना बियाणे खरेदीसाठी प्रति हेक्टरी रु.१५००/- अनुदान देण्याचे प्रस्तावित करण्यात आले होते. व राज्यातील ज्या तालुक्यांमध्ये दि.३१ जुलै,२०१५ अखेर सरासरी पर्जन्यमानाच्या ५०% पेक्षा कमी पाऊस झाला असेल अशा २० जिल्हयांतील तालुक्यांमध्ये राबविण्याचे आदेश देण्यात आले होते.

तथापि, तदनंतरच्या कालावधीत राज्यातील पर्जन्यमानाचे प्रमाण कमी झाल्यामुळे दुष्काळसदृश्य प्रतिकूल परिणामांना तोंड देण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम २० जिल्हयांतील अन्य दुष्काळसदृश्य तालुक्यांमध्ये तसेच अन्य जिल्हयातही राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढील आदेश देत आहे.

## शासन निर्णय :-

१. सन २०१५-१६ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत गतिमान वैरण विकास कार्यक्रम शासन निर्णय दि. ३१.०७.२०१५ अन्वये सुनिश्चित करण्यात आलेल्या २० जिल्हयांतील समाविष्ट तालुक्यांबरोबरच आवश्यकतेनुसार अन्य तालुक्यांमध्येही राबविण्यात यावा.

२. वरील क्र.१) अनुसार कार्यक्रमाचा लक्ष्यांक उरल्यास राज्यातील अन्य जिल्हयांतील मागणीनुसार सदर लक्ष्यांक वापराण्यात यावा.

३. सदर कार्यक्रमांतर्गत जे शेतकरी नेपियर, यशवंत, जयवंत, बायफ-१०, मारवेल, गजराज इत्यादी सारख्या बहुवार्षिक चाऱ्याची लागवड करु इच्छितात त्यांना सदर ठोबांची लागवड करण्यास ठोंबाच्या लागवडीतील अंतर विचारात घेऊन १० गुंठे/५ गुंठे ठोंब लागवडीकरीता कमाल रु.१५००/- इतक्या मर्यादेत अनुदान देय राहील. ( उदा.नेपियर ९०x६० से.मी.अंतरावर किमान १० गुंठे, मारवेलसाठी ४५x३० सें.मी.अंतरावर किमान ५ गुंठे क्षेत्र लागवड)

४. स्थानिक पातळीवरील गरजा/आवश्यकता विचारात घेऊन गतिमान वैरण विकास कार्यक्रमांतर्गत रु.२५.०० कोटीचा सुधारीत लाक्षांक निश्चित करण्यात यावा.

५. शासन निर्णय क्रमांक:कृविका-२०१५/प्र.क्र.१९८/३अे, दि.३१.७.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात आलेले इतर आदेश कायम राहातील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१४१७३७३११४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=10d36944a4b86eab516b1b7018370 9c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2015.09.14 17:40:51 +05'30'

**( विक्रम ढमाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे
४. सचिव (पदुम),कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. सचिव (मृद व जलसंधारण),ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
६. सचिव, ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
७. सर्व विभागीय आयुक्त

८. सर्व मा. विधानसभा/परिषद सदस्य
९. आयुक्त, कृषि , महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
१०. आयुक्त, सहकार,महाराष्ट्र राज्य,पुणे
११. आयुक्त, पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य,पुणे
१२. आयुक्त, दुग्धव्यवसाय,वरळी, मुंबई, महाराष्ट राज्य
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. संचालक विस्तार व प्रशिक्षण तथा कृषि नोडल अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,(५ जादा प्रतीसह)
१६. सर्व संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
१७. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१८. संचालक,पणन, सहकार विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे
१९. सर्व जिल्हयांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
२०. महालेखापाल, (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१ मुंबई
२१. महालेखापाल,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),महाराष्ट्र-२ नागपूर
२२. माहिती व जनसंपर्क संचालनालय (५प्रतीसह) नियोजन विभाग /वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
२३. सर्व उप सचिव ( कृषि ),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२४. राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२५. निवड नस्ती (का.३ अे )